केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) करीता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**क्रमांक: भासशी-२०२१/प्र.क्र.१७१/शिक्षण-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ०६ डिसेंबर, २०२१

संदर्भ : १. केंद्रीय ग्रामीण विकास, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे F. No.१(१३) PFMS/FCD/२०२०, दिनांक २३/०३/२०२१ रोजीचे पत्र.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:संकीर्ण-२१२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दिनांक १/७/२०२१.

३. शासन निर्णय क्रमांक: भासशी-२०२१/प्र.क्र.१७१/शिक्षण-१, दिनांक ३ सप्टेंबर,२०२१

४. आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक,११८/२०२१/का.४ ब/२०२१-२२/२८९३, दि.२०.१०.२०२१

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधीन दिनांक २३ मार्च, २०२१ रोजीच्या आदेशान्वये सुधारीत कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यास अनुसरुन वित्त विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) बाबत सुधारीत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी एका Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Bank Account उघडणे आवश्यक आहे.त्याचबरोबर सदर केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उप सचिव दर्जाच्या अधिका-याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याबाबत वित्त विभागेने निर्देशित केले आहे. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांकरीता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer ची नियुक्ती शासन निर्णय दिनांक ३ सप्टेंबर,२०२१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेली होती.

२. तथापी आयुक्त, समाजकल्याण यांनी त्यांच्या दिनांक २०.१०.२०२१ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार भविष्यात योजनेंतर्गत केंद्रीय अनुदान प्राप्त होणे व शिष्यवृत्तीच्या लाभाच्या परिणामकारक वितरणामध्ये कोणत्याही प्रकारची क्षेत्रियस्तरावर संदिग्धता निर्माण होणार नाही यास्तव केंद्र पुरस्कृत मॅट्रीकपूर्व शिष्यवृत्ती योजना अंतर्गत इयत्ता ९ वी व १० वी या वर्गात शिकत असलेल्या अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांकरीता मॅट्रीकपूर्व शिष्यवृत्ती व अस्वच्छ व्यवसायात काम करणा-या पालकांच्या मुलांना मॅट्रीकपूर्व शिष्यवृत्ती या दोन योजनांची जिल्हास्तरावरील अंमलबजावणी पाहता सदर दोन योजनांकरीता प्रत्यक्ष अंमलबजावणी संस्था (Implementing Agency) म्हणून सर्व जिल्हयाचे समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्रत्येक जिल्हा कार्यालयामध्ये नोडल आफीसर म्हणून नेमणूक / नामनिर्देशित करण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झालेला आहे.

३. या व्यतिरिक्त दिनांक १५.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनांकरीता सिंगल नोडल ऐजंन्सी (SNA) करिताचे योजनानिहाय स्वतंत्र बँक खाते शासनस्तरावरुन उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत भारत सरकार मॅट्रीकपुर्व शिष्यवृत्ती संबंधीत योजनांच्या अंमलबजावणी तथा समन्वयासाठी जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परीषद यांची Implementing Agency म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच केंद्रपुरस्कृत भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती संबंधीत योजनेच्या अंमलबजावणीसाठी तथा समन्वयासाठी सहायक आयुक्त, समाजकल्याण, यांची जिल्हास्तरावर Implementing Agency म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. तसेच शासन निर्णय दिनांक ३.९.२०२१ अन्वये, शासनस्तरावर अवर सचिव (शिक्षण-१) , सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांची Single Nodal Agency (SNA) व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या स्तरावर सहआयुक्त (शिक्षण) यांची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. तसेच शासन निर्णय दिनांक ८.१.२०१९ अन्वये आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांची केंद्रभूत आहरण व संवितरण अधिकारी म्हणून केलेली नियुक्ती कायम ठेवण्यात येत आहे.

३. उपरोक्त केंद्रपुरस्कृत तीनही योजनांकरीताचे सिंगल नोडल एजेंन्सी (SNA) व Nodal Officer, तसेच Implementing Agency या तीनही स्तरावरील योजनाचे, योजनानिहाय बँक खाते (Zero Balance Subsidiary Account) **बँक ऑफ महाराष्ट्र** या राष्ट्रीयकृत बॅकेत उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२११२२१११४५४२४५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSITANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce, pseudonym=E4B65E741A4E068C8794948A6098246DB7DA095A, serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2021.12.21 11:47:08 +05'30'

**( अश्विनी यमगर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. संचालक (FCD), केंद्रीय ग्रामीण विकास, मंत्रालय, नवी दिल्ली
८. उपसचिव (अर्थसंकल्प)/(विघयो), सा.न्या.व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई
९. सहसचिव/अवर सचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सह आयुक्त (शिक्षण), समाजकल्याण आयुक्तालय, पुणे (व्दारा आयुक्त, समाजकल्याण, पुणे)
११. सर्व समाजकल्याण अधिकारी (जिल्हा परिषद)/ सहायक आयुक्त, समाजकल्याण (व्दारा आयुक्त, समाजकल्याण, पुणे)
१२. महाव्यवस्थापक, बॅक आफ महाराष्ट्र, मुंबई
१३. निवड नस्ती.